गु.प्र.शाखा, गु.प्र.क्र.४९/२०१९ (आग्रीपाडा पोलीस ठोण, गु.नों.क्र.१५७/२०१९) मधून उद्भवलेल्या मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रकरणामध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत. (डॉ. पायल तडवी आत्महत्या प्रकरण)

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- एसपीपी-०५१९/प्र.क्र.२०४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ मार्च, २०२०

संदर्भ :- विधि व न्याय विभागाची अधिसूचना क्रमांक एसपीपी-१०१९/यु.ओ.आर.२५/ डी-१४, दिनांक :- ०१.०६.२०१९

**शासन निर्णय :-**

गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.र.क्र. ४९/२०१९ (आग्रीपाडा पोलीस ठाणे, गु.र.नं.१५७/२०१९), भा.दं.वि. ३०६, ३४ सह ४ महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट सह कलम ३(१०) अनुसूचित जाती व जमाती अत्याचार प्रतिबंधक कायदा सह कलम ६७ माहिती तंत्रज्ञान कायदा २००० अन्वये दाखल प्रकरणात उद्भवणाऱ्या मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई प्रकरणी शासनाची बाजू भक्कमपणे मांडण्यासाठी ॲड श्री. राजा ठाकरे यांची उपरोक्त नमुद शासन अधिसुचना, विधि व न्याय विभाग, दिनांक ०१.०६.२०१९ अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड श्री. राजा ठाकरे यांना खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक उपस्थितीस व्यावसायिक फी - रु.५०,०००/-
ब) सल्लामसलत (Conference) दर तासाला- रु.५,०००/-
(जास्तीत जास्त रुपये १५,०००/-)

ॲड श्री. राजा ठाकरे यांना अन्य कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

२. सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत. कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२६/१९/व्यय-७, दिनांक २८.०६.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३१७१५४६३७४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.03.17 15:48:32 +05'30'

**( किशोर भालेराव )**
उप सचिव (विधी), महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), १ /२ ,महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. ॲड. श्री. राजा ठाकरे, ३०१ मारुती मेन्शन, १७ रघुनाथ दादाजी मार्ग, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
८. विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय ७), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती/पोल-१०.